महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(केंद्र हिस्सा - २५०१ २९६२)
(राज्य हिस्सा - २५०१ २७९३)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.८/कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - ११ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) ग्रामविकास विभागाची नस्ती क्र.मजिआ-२०२१/प्र.क्र.७० /योजना-३

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ग्राम विकास विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत (NRLM) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान या योजनेचा केंद्र हिस्सा रु.३०७७.७६ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.२०५१.८४ लाख इतका निधी सन २०२१-२२ च्या आर्थिक तरतुदींतून वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये सादर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २५०१ - ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम यामधील राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत NRLM (TSP) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता सन २०२१-२२ या वर्षातील तरतुदींतून वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार केंद्र हिस्सा रु.३०७७.७६ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.२०५१.८४ लाख इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | सदर शा अन्वये .नि. वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत NRLM (TSP) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान | २५०१ २९६२ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | १२१७६.०० | ३०७७.७६ |
| | २५०१ २७९३ राज्य हिस्सा (४० टक्के) | | ५०००.०० | २०५१.८४ |
| | **एकूण** | | **१७१७६.००** | **५१२९.६०** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु. ५१२९.६० लाख (अक्षरी रुपये एकावन्न कोटी एकोणतीस लाख साठ हजार फक्त)** निधी प्रशासकीय प्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि अनौपचारिक संदर्भ क्र.९२३/व्यय-१४, दि.२१.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०२१७३९४५६४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2021.11.11 16:06:35 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई

४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
९. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. ग्रामविकास विभाग, योजना- ०३, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अधिकारी, (का. २/१७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.